# वाचक मित्रांनो

असेच मित्र असो सदा....!

न व्हावा विसर त्यांचा कदा..!!

गेले क्षण ते पुन्हा यावे...!

स्मरणीय नित्य ते कायम असावे...

हीच एक माझी अर्चना...!

ईश्वर चरणी प्रार्थना...!!

✒शीघ्र कवि- प्रकाश...🙏

‘शब्द शिदोरी’.------

क्षणाक्षणाचे कण कण वेचत….काहीतरी वाचू या….।

वाचता वाचताच सूचले काही…तर शब्दातही ते छेडू या…।।

नकोच नुसता गोंधळ मनी तो..विचारातला त्रास कसा..।

लिहित असता काहीतरीच… लेखक झालो कसाबसा..।।

आता येणे नसो माघारी…घेतली लेखन उभारी..।

वाचकांच्या प्रतिसादाने…लिहू लागलो ‘लयभारी’…।।

आत्मस्तुतीचा व्देष स्विकारता.. अहंकार तो नाही मनी…।

लिहितांना जो लिहित असतो… शब्द पुरवी तो देव-लेखणी..।।

लेखनाची कलाच न्यारी..आहे मलाही प्यारी..।

प्रचंड वाचन करता गवसली…गूढ-रहस्य ही शब्द-शिदोरी..।।-

----कवि प्रकाश

मनात विचार येता क्षणी...सहज थांबवा त्याच क्षणी..!

गुणगुणावे. रमावे..नेहमीच गाणी.. किंवा ग्लासभर प्यावे पाणी..!!

नाहीच जमले तर मग..बघावी एखादी रमणी! ( रमणीय स्थिती)

क्षणात असू द्या ती मनी... असे करावे दैनंदिनी...!!

तेंव्हा सुखकर होईल जीवनी...पण नसावी जीवनात चिंता..!

व्यर्थ उशाशी कशास चिता..ईश्वरी क्षण उपभोग आता..!!

हेच जीवनाचे यंत्र.. नाही कोणता मंत्र..!

सुखी असावे सुखी करावे... दु:ख न कोणा कदापि ही..!!

आलो जसे तसेच जावे..मनी असूस दयावे समाधान..!

ठेविले अनंते तसैचि रहावे.. माया मोह न लोभ उरवावे. !!

शब्द नव्हेत हे विचार अंती.. सोडा सगळी ‘कलह-भ्रमंती’..

मी जाता येथे राहील काय... जन क्षणात म्हणतील हायSSहाय...”कवि प्रकाश”

**********

‘न ईति’ -नेति.

रंगहीन ते सुंदर पाणी..नितळ किती ते असती..

पायी स्पर्शता लहर तयाची.. मनमोहक भासती...

ऋतू बदलता.. बर्फाने जणू वसुंधरा झाकली...

ढगाळ सावट, धुक्यातूनही.. पहाड सृष्टी शृंगली..

काय असावे कारण याचे...बुध्दि मान शोधती..

महाकारण असे अचंबित... ऋषीही म्हणती ‘नेति नेति’....

कवितेचे स्थळ- लिव्हनवर्थ (Levenworth Town), Wenatchee Lake, USA. Dt. 6.10.2023

*************

..कवितेचे नांव आहे ‘जाणीव’.

“जाणीव”- कविता

रंग बदलती, ऋतू बदलता, हिरवी झाडांची पाने..

तयास येती लाली मग.. ते सौंदर्याचे लेणे....

कधी ढगांचे सावट वरती..नदीवर पाणी खळबळती..

पहाडातल्या जलधाराही...आनंदाश्रू वाहती...

निसर्गभावना सृष्टीत आली.. नयन तृप्ती जाहली...

पाहता पाहता क्षणात विरली... मनीही सदिच्छा झिरपली..

असेच व्हावे विचारातही...कधी कधी हे येई मनात...

क्षणात व्हावा विसर दु:खांचा..अनंत अशा हया आसमंतात...

शून्य असे जे शून्यच असावे...एकोSहम् न बहू स्याम्.

शब्द नको तो ध्वनी असावा..मनी एकच ओंकार...

“हरी ओम तत्सत” !....

प्रकाश राऊत Seattle, USA कवितेचे स्थळ- Leavenworth Town, USA ( 150 km. from Seattle)**********

टीप --- जे सूचलं ते लिहिलं आहे, खरं म्हणजे मी कवि नाहीच पण म्हणून काय आपण आपल्या भावनांना वाट मोकळी करून दयायची नाही. मी तसा प्रति लीपीवरचा गोल्डन बॅज ऑथर आहे असे प्रति लीपीने माझा गौरव केला आहे करीत हा संग्रह मी अर्काईव्ह डॉट कॉमवर अपलोड केला आहे  व तेही खास वाचकांसाठी मोफत बरं कां......

लेखक प्रकाश राऊत, अमरावती, महाराष्ट्र पण सध्या अमेरीकेत वास्तव्यास आलो आहे करीत हा अल्पसा प्रयत्न चुकून केला आहे याची वाचकांनी नोंद घ्यावी ही विनंती.

...........................................................................................

समाप्त Date:- Nov. 7, 2023

*********